यावल पंचायत समिती (जि. जळगाव) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१६/प्र.क्र. २६१ /पंरा-७

मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मुंबई- ४०० ००१

तारीख: ३१ मार्च, २०१७

वाचा :-

१) अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,जळगाव यांचे पत्र क्र. बांधकाम/प्र.आ/इबा.यावल पंस/ २२१/२०१६, दि. २५.०१.२०१६ १व क्र. बांधकाम/प्र.आ/आर आर/१२४/२०१६, दि. ०८.०८.२०१६

प्रस्तावना :-

१. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांनी वरील पत्रान्वये यावल पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. यावल पंचायत समितीची अस्तित्वातील इमारत जीर्ण झाल्यामुळे व सदर इमारत ही प्रशासकीय कामाच्या दृष्टीने अपुरी असल्याने कामाकाजामध्ये गैरसोय होत आहे. त्यामुळे नवीन प्रशासकीय इमारत बांधकाम करण्याकरीता पंचायत समितीने दिनांक ०२.०९.२०११ रोजी ठराव क्र. ८५३ पारीत केला आहे. सदर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम गट क्र. ६९८ मधील जागेत प्रस्तावित आहे. यावल पंचायत समिती " ब " वर्गात मोडते. त्यानुसार, अति. मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, जळगाव यांनी, पंचायत समिती यावल नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता तळमजला एकूण १२५४.०० चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले असून, याकरीता एकूण रू. ३०१.२२ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. यामध्ये कंपाऊंड वॉल, अंतर्गत रस्ते, नाली बांधकाम यांचा समावेश आहे. या बाबी इतर पंचायत समितींना नवीन प्रशासकीय मान्यता देतांना वगळण्यात येत असल्यामुळे इतर पंचायत समिती बांधकामांना प्रशासकीय मान्यता दिल्यानुसार यावल पंचायत समिती नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देणे योग्य होईल. सदर अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारीत असून ते उप अभियंता व कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, जळगाव यांनी सांक्षाकीत केले आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांनी प्रस्तावासोबत पंचायत

समितीच्या ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत, जागेचा उतारा, ले-आऊट प्लॅन, साईट प्लॅन, स्थळ दर्शक नकाशा व अस्तित्वातील इमारतीचे फोटो, अस्तित्वातील इमारत पाडण्याबाबतचे ना-हरकत प्रमाणपत्र इत्यादी कागदपत्र सादर केली आहेत.

३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननीअंती यावल पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता एकूण रु. २७०.७८ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

४. यावल पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम गट क्र. ६९८ मधील १२५४ चौ.मी. क्षेत्रफळाच्या जागेत करण्याकरीता एकूण रु. २,७०,७८,०००/- (रु. दोन कोटी सत्तर लक्ष अठ्ठ्याहत्तर हजार फक्त) इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) नियोजित यावल पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या विहीत नमुना आराखड्यास मुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां. वि.मुंबई /उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ प्रादेशिक विभाग, सा.बां.मंडळ यांची मान्यता घेऊन हाती घेताना स्थानिक नगर रचना प्राधिकरणाची तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित यावल पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यात पदाधिकारी यांच्या दालनालगत महिला पदाधिकाऱ्यांसाठी प्रसाधनगृहा-सह विश्रांती कक्षाची व्यवस्था करण्यात यावी.

३) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

४) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

६) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यते पेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती / जिल्हा परिषदेने सोसावा.

७) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

५. यावल पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा मंजूर सर्वसाधारण गोषवारा खालील प्रमाणे आहे :-

| FINAL ABSTRACT FOR CONSTRUCTION OF YAWAL P.S. ADMIN., BLDG. | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost Rs.** |
| 1 | COST OF WORK PORTION | 20359615.00 |
| 2 | Add 11% FOR ELECTRIFICATION | 2239557.65 |
| 3 | Add 8 % WATERSUPPLY & SANITATION | 1628769.20 |
| 4 | Add 2 % FOR RAINWATER HARVESTING & FIRE FIGHTING | 407192.30 |
| 5 | Add 6% FOR PRICE VARIATION | 1221576.90 |
| 6 | Add 4% CONTINGENCIES | 814384.60 |
| 7 | Add 2 % FOR COMPUTERISATION | 407192.30 |
| | TOTAL Rs | 27078287.95 |
| | SAYS Rs | 27078000.00 |

६. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३३११९०४३९४३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2017.04.05 18:26:24 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त नाशिक विभाग, नाशिक
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो./ मु.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद जळगाव
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद जळगाव
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद जळगाव
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद जळगाव
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा जळगाव
९) गट विकास अधिकारी, पंचायत समिती यावल, जिल्हा जळगाव
१०) सभापती, पंचायत समिती यावल, जिल्हा जळगाव
११) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१२) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जळगाव
१३) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जळगाव
१४) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ फोर्ट, मुंबई